

<u>प्रतिनियुक्तीने नियुक्ती व पदस्थापना</u>

**श्रीम. सु. म. नेर्लीकर, तहसीलदार**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**

**पूरक पत्र क्र. आस्थाप्र २०२४ / प्र. क्र. ०६/ आस्था २**

मंत्रालय विस्तार, पहिला मजला,

मंत्रालय, मुंबई ३२

दिनांकः- ०५ ऑगस्ट, २०२४

**संदर्भः** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. एसआरव्ही - २०१६ / प्र. क्र. ५१० / कार्या.१२, दि. १७/१२/२०१६ आणि दि. १६ फेब्रुवारी, २०१८

२) शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. आस्थाप्र - २०१७ / प्र. क्र. ०८ / आस्थापना - २, दि. १४ जानेवारी, २०२१ आणि दि. २२ मार्च, २०२२

३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांचे आदेश क्र. मह / आस्था / ४ /कावि / १७८२ / २०२३, दि. २८.१२.२०२३

४) या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि.१० जून, २०२४

**शासन निर्णयः-**

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्रमांक १ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांच्या अधीन राहून संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये श्रीम.सुनीता म. नेर्लीकर, तहसीलदार यांची इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या कोल्हापूर येथील सहायक संचालक, जिल्हा कार्यालयात सहायक संचालक या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार श्रीम.सुनीता म. नेर्लीकर यांनी दि.१०.०६.२०२४ रोजी सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, कोल्हापूर या पदाचा पदभार स्वीकारला आहे.

२. संदर्भ क्रमांक २ येथील दि. २२ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार सहायक संचालक या पदाची वेतनश्रेणी एस १८, ₹४९,१०० - ₹१५५,८०० आहे. संदर्भ क्रमांक ३ येथील दि. २८.१२.२०२३ च्या आदेशान्वये श्रीम. सुनीता म. नेर्लीकर, तहसीलदार यांना दि. ०५.०६.२०२३ पासून आश्वासित प्रगती योजने अंतर्गत एस-२० ₹५६,१०० - ₹१७७,५०० ही वेतनश्रेणी लागू करण्यात आली आहे.

३. श्रीम. सुनीता म. नेर्लीकर, तहसीलदार या सहायक संचालक, इ.मा.ब.क., कोल्हापूर या पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असण्याच्या कालावधीत सहायक संचालक या

एका पदाची वेतनश्रेणी एस १८, ₹४९,१०० - ₹१५५,८०० वरून उन्नत करून एस-२०, ₹५६,१०० - ₹१७७,५०० अशी करण्यास मंजुरी देण्यात येत आहे. श्रेणी उन्नत केलेले उपरोक्त सहायक संचालक हे पद, श्रीम. सुनीता म. नेर्लीकर ह्या त्या पदावर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहील, त्यानंतर ते पद आपोआप मूळ वेतनश्रेणीत, म्हणजे एस १८, ₹४९,१०० - ₹१५५,८०० या वेतनश्रेणीत श्रेणी अवनत होईल.

४. सदर मंजुरी आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६७ / २०२४ / सेवा-९, दि. २३.०७.२०२४ अन्वये या विभागास प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०५१४४८४२१५३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.08.05 15:03:26 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीम. सुनीता म. नेर्लीकर, सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन, विचारेमाळ,कोल्हापूर.

**प्रत,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
२. जिल्हाधिकारी, कोल्हापूर, जिल्हाधिकारी कार्यालय, स्वराज भवन, नागाळा पार्क, कोल्हापूर, पिन ४१६ ००३.
३. प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक)विभाग, कोल्हापूर.
४. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, कोल्हापूर.
५. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव, (ई ७), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

७. उप सचिव, (सेवा ९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)- १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई

९. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर

१०. मा. मंत्री ( इ.मा.ब.क. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

११. प्रधान सचिव ( इ.मा.ब.क.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१२. निवडनस्ती.